कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाचा अनु. जाती प्रवर्गाचा तिसऱ्या हप्त्याचा निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राफअ-२०२३/प्र.क्र. २५६/९-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १५ मार्च, २०२४

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:एमआयडीएच/२०१४/प्र.क्र.८२/९-अे, दिनांक ३० मे, २०१४
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२३/प्र.क्र.२३२/९-अे, दिनांक ११ ऑगस्ट, २०२३
४. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२३/प्र.क्र.२५६/९-अे, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०२३
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२३/प्र.क्र.२५६/९-अे, दिनांक १९ जानेवारी, २०२४
६. केंद्र शासनाच्या कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. F.No.15011/12/2023-MIDH, Dated: 26th February, 2024
७. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/लेखा/तिसरा हप्ता मागणी/६४८३/२०२४, दिनांक २७.०२.२०२४ चे पत्र
८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८ डिसेंबर, २०२३
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: विघयो-२०२४/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प, दिनांक १२ मार्च, २०२४
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १५ मार्च, २०२४

प्रस्तावना:-

राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) ही योजना संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली आहे. उक्त योजना सन २०२३-२०२४ मध्ये राज्यात राबविण्यासाठी संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रुपये २१२०७.२५ लाख एवढ्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाचा पहिल्या व दुसऱ्या हप्त्याचा निधी संदर्भ क्रमांक ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भ क्रमांक ६ येथील पत्रान्वये सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून अनुसूचित जाती प्रवर्गाचा तिसऱ्या हप्त्याचा निधी राज्यास प्राप्त झाला आहे. या पार्श्वभूमीवर अनुसूचित जाती प्रवर्गाचा उर्वरीत अर्थसंकल्पीत निधी (केंद्र हिस्सा व त्याला समरुप राज्य हिस्सा) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भ क्र. ९ येथील शासन परिपत्रकान्वये कृषि विभागास वर्ग केला आहे. तसेच सदर योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा तिसऱ्या हप्त्याचा निधी (केंद्र हिस्सा व त्याला समरुप राज्य हिस्सा) वितरीत करण्यासाठी पुरेशी अर्थसंकल्पीत तरतुद उपलब्ध नसल्याने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भ क्र. १० येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे आवश्यक निधी कृषि विभागास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आयुक्त (कृषि) तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान ही योजना सन २०२३-२०२४ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जाती प्रवर्गाचा तिसऱ्या हप्त्यापोटी मंजूर केंद्र हिस्सा (२४०१B०८१) रु. २,४७,१५,०००/- व राज्य हिस्सा (२४०१B०९९) रु. १,६४,७६,६६७/- निधी असा एकूण रु.४,११,९१,६६७/- निधी (रुपये चार कोटी अकरा लाख एक्याण्णव हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणिऔषधीवनस्पतीमंडळ, पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पित निधी केंद्र शासनाने विहीत केल्याप्रमाणे अनुसुचित जाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसूचित जाती | मागणी क्र. - एन -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७८९)-अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्याक्रमांतर्गत योजना<br>(०१) (०१) कृषि उन्नती योजना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B०८१) | मागणी क्र. - एन -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७८९)-अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्याक्रमांतर्गत योजना<br>(०१) (०२) कृषि उन्नती योजना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम)<br>३३ -अर्थसहाय्य (२४०१ B०९९) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविणेबाबत दक्षता घ्यावी.

६. विभागप्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. प्रस्तुत आदेश वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३ व दि. ०८ डिसेंबर, २०२४ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार, वित्त विभागाचा औनौ. संदर्भ क्र. २९३/२०२४/व्यय-१४, दि. १५ मार्च, २०२४, तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: विघयो-२०२४/प्र.क्र.६१/ अर्थसंकल्प, दिनांक १२ मार्च, २०२४ व

शासन निर्णय क्रमांक: बीजीटी-२०२३/प्र.क्र. ६१/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १५ मार्च, २०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२०५१३१६९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.03.15 21:00:42 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मंत्री (फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
४) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंई ४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
९) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१४) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१५) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर.
१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
२१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२२) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२४) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५) निवड नस्ती/९-अे.